**सन २०२४-२५ मध्ये मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत वैयक्तिक शेततळे या घटकाकरिता ₹६३९.४० लक्ष निधी वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक : मुशाशे-०४२४/प्र.क्र.११३/१४-अे

मादाम कामा मार्ग, हितात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२५.

**वाचा -**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कोशाशे-४२१८/प्र.क्र.८६/८-अे, दिनांक १९ ऑगस्ट, २०१९.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०६१९/प्र.क्र.१६४/१४-अे, दिनांक १८ नोव्हेंबर, २०२१.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.७५/१४-अे, दिनांक २९ जून, २०२२.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मुशाशे-०५२४/प्र.क्र.११३/१४-अे, दिनांक १६ मे, २०२४.
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/मृदसं.वै.शेततळे/निधीमागणी/मृद-७/११९७१/२०२४, दिनांक २४ एप्रिल, २०२४.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मुशाशे-०४२४/प्र.क्र.११३/१४-अे, दिनांक ०९ जुलै, २०२४.
७) संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे कार्यालयाचे पत्र क्र. कृआ/मृदसं/वै.शेततळे/निधी मागणी/मृद-१/२०५७३/२०२४, दिनांक १३.०८.२०२४.
८) संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे कार्यालयाचा ई-मेल दिनांक २६.१०.२०२४.
९) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मुशाशे-०४२४/प्र.क्र.११३/१४-अे, दिनांक ०३ जानेवारी, २०२५.
१०) संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे कार्यालयाचे पत्र क्र. कृआ/मृदसं/वै.शेततळे/निधी मागणी/मृद-१/६०४९/२०२५, दिनांक १७.०३.२०२५.

**प्रस्तावना -**

राज्यातील शेतकऱ्यांना शाश्वत सिंचनाची सोय उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने अवर्षणप्रवण क्षेत्र तसेच आत्महत्याग्रस्त व नक्षलग्रस्त जिल्ह्यात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना राबविण्यास दिनांक १९ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली असून सदर योजना राज्यातील उर्वरित तालुक्यांमध्ये देखील राबविण्याचा निर्णय शासनाने दिनांक १८ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन

योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनास पूरक अनुदानाबरोबरच, वैयक्तिक शेततळे, शेततळ्याचे अस्तरीकरण, हरित गृह उभारणे व शेडनेट हाऊस उभारणे या घटकांकरिता अनुदान वितरीत करण्यात येते.

सन २०२४-२५ मधील वित्त विभागामार्फत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेच्या ₹४०० कोटीच्या (सूक्ष्म सिंचनाकरिता पूरक अनुदान घटकासाठी ₹३०० कोटी + वैयक्तिक शेततळे घटकासाठी ₹१०० कोटी) कार्यक्रमास दिनांक १६ मे, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

कृषि आयुक्तालयाकडून प्राप्त मागणी व सद्यःस्थितीत असलेल्या प्रलंबित दायित्वाच्या अनुषंगाने मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत वैयक्तिक शेततळे या घटकाकरीता ₹६३९.४० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

सन २०२४-२५ या वर्षात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत वैयक्तिक शेततळे या घटकाकरीता ₹६३९.४० लक्ष (रुपये सहा कोटी एकोणचाळीस लक्ष चाळीस हजार मात्र) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहेत.

२. याद्वारे वितरीत निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३,
२४०१, पिक संवर्धन,
(००) (२२) मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना,
(सर्वसाधारण) (कार्यक्रम),
३३, अर्थसहाय्य
(२४०१ बी ०७२)

३. या योजनेंतर्गत निवड झालेल्या लाभार्थ्यांना अनुदान अदागयीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे जमा करावी. अनुदान अदा केल्यानंतर अनुदान अदा करण्यात आलेल्या लाभार्थ्यांच्या नावासहीत सविस्तर प्रमाणित तपशिल शासनास तात्काळ सादर करावा.

४. लाभार्थ्यांना अनुदान अदा करताना द्विरुक्ती होणार नाही याची सर्वतोपरी दक्षता घ्यावी. अनुदान अदागयी करण्याची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांची राहील.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी योजनेंतर्गत मंजूर निधी संबंधित जिल्ह्यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे वितरित करावा.

७. या शासन निर्णयान्वये वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १९०/२०२४/व्यय-१, दिनांक ११ जून, २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२११५४७१५६३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.03.21 15:48:26 +05'30'

**( अं. सा. चंदनशिवे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
९. विभागीय कृषि संचालक (सर्व).
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
११. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपुर.
१२. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपुर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे.
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१६. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (कार्यासन१४-अे).